नवनाथ भक्तिसार अध्याय नववा

मच्छिंद्रनाथ प्रभू रामचंद्रांच्या वास्तव्याने पावन झलेल्या अयोध्या नगरीमधील श्रीरामाच्या वैभवशाली मंदिरात गेले असता द्वारपालांच्या वागणुकीमुळे संतापले आणि त्यांनी अयोध्येचा महाराजा पाशुपत यालाच धडा शिकविला पण महामंत्र्याच्या सावधगिरीने आणि शिष्टाईने या वादाची उग्रता वाढली नाही पाशुपत राजाने क्षमायाचना केली आणि प्रभू रामाच्या प्रत्येक्ष दर्शनाची इच्छा व्यक्त केली. प्रभू रामचंद्र हे सूर्यवंशातले म्हणून त्यांना सूर्यदेवाशी संग्राम करावा लागला, संग्राम म्हणण्यापेक्षा कठोर तपश्चर्येच्या साधनेतून नाथांनी मिळवलेल्या सिद्धींचे प्रत्याक्षिकच म्हणायचे. जगतकल्याणासाठी, लोककल्याणासाठी आपण कोणत्याही टोकाला जाऊ शकतो आणि हेतू साध्य करतो अशीच नाथांची धारणा असायची. याप्रसंगी श्रीरामाचे दर्शन पाशुपतास देण्याचे सत्कृत्य तर केलेच पण स्वतःसाठीही सूर्यनारायणाचे आशीर्वाद आणि वर मिळवले. मच्छिंद्रनाथ श्रीशंकर आणि दत्तात्रेयांच्या भेटीनंतर आणि श्रीगुरुदेव दत्तात्रेयांकडून सर्वगुणसंपन्नतेचा आशीर्वाद घेऊन तीर्थाटनास निघाले, त्याला एका तापाचा अवधी पूर्ण झाला होता, या बारा वर्षाच्या कालावधीत त्यांनी सप्तशृंगीमातेच्या दर्शनापासून प्रारंभ केला आणि सप्तमोक्षपुरे म्हणजे अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिकापुरी, द्वारका अशी यात्रा करीत पुनश्च बंगाल राज्यात परतले गावात भिक्षाटन करीत ते चंद्रनगरीत पोहोचले आणि सर्वोपदयाळ नावाच्या ब्रह्मणाच्या वाड्याजवळ आले. नाथांच्या स्मरणात होते की आपण बारा वर्षापूर्वी याच घरातील सरस्वती नावाच्या अपत्यहीन साध्वी स्त्रीला पुत्रप्राप्तीस्तव भस्म दिले आहे आणि परमेश्वरी वरदानाने जन्मलेला तो बालक आता मोठा झाला असेल. त्याला आणि त्याच्या मातेला भेटण्यासाठी नाथांनी वाड्यात प्रवेश करून साद घातली; “अहो, सरस्वती माई!! बाहेर यावे!”

नाथांची हाक ऐकून त्या स्त्रीने बाहेर डोकावून पहिले असता, कोणीतरी जोगी भिक्षा मागण्यासाठी आला आहे असे समजून पात्रात भिक्षा घेऊन बाहेर आली आणि नाथांच्या झोळीत टाकू लागली बारा वर्षापूर्वीच्या घटनेच्या खाणखुणा उमजून घेण्याच्या उद्धेशाने नाथ विचारू लागले;

“माई! आपले नाव काय आहे? आपल्या पतीचे नाव काय आहे?”

ब्राह्मणपत्नी उत्तरली, “मी सरस्वती! आणि माझ्या पतीचे नाव ‘सर्वोपदयाळ’ असे आहे”

“आपण कोणत्या जातीचे आहात?”

“गौड ब्राह्माण”

“माई! तुझ मुलगा कुठे आहे? त्याला बोलव” नाथ म्हणाले. त्यावर ती साध्वी म्हणाली, “महाराज! माझ्या पोटी संतान नाही. दुर्भाग्याने मी निपुत्रिक आहे.”

त्यावर मच्छिंद्रनाथ म्हणाले, “माई! तू खोटे बोलू नकोस. बारा वर्षापूर्वी मी तुला संजीवनी मंत्राने भारलेले भस्म खाण्यासाठी दिले होते. त्यापासून झालेला दिव्य अवतारी पुत्र दाखव. पोटी संतान नाही म्हणतेस काय? त्या भास्मातून अजरामर किर्तीमान पुत्र जन्मणार होता. वायूप्रमाणे चपळ आणि साक्षात शिवाप्रमाणे तेजस्वी असा तुझा बालक असेल. माई! त्याळा त्वरेने बोलोव. मला त्याच्या भेटीची ओढ लागली आहे.” नाथांचे हे बोलणे ऐकून सरस्वतीला बारा वर्षापूर्वीची आठवण झाली आणि तिने मच्छिंद्रला ओळखले आपण आतताईपणाने दुसऱ्या स्त्रियांच्या टीकेने गैसमज

करून घेतला आणि भस्म उकिरड्यांत फेकल्याचे आठवले. आता त्याला मुलगा कुठून दाखवू? हा जोगी आता मला शिक्षा करील. कदाचित शाप देऊन माझे भस्म करील, किंवा वृक्षाप्रमाणे मला अचल करील. आता मी काय करावे? ती घाबरली. ह्रदयची धडधड वाढली अंगाला दरदरून घाम फुटला, मी शतमुर्ख आहे. नाहक या कानफाडयाच्या नादी लागले. शेजारणीने सांगितले होते, त्याप्रमाणे काही विपरीत कारणी केली तर?? आता काय संकट माझ्यावर येणार ते येवो, नशिबात असेल ते घडेल. बारा वर्षापूर्वीचे स्मरण ठेवून हा जोगी आला ही वस्तुस्थिती आहे. आता तो माझी दैना केल्याशिवाय सोडणार नाही. आपण भस्म खाल्ले नाही हे आपले चुकले काय? अशा प्रकारे विचार करीत ती भान हरपल्याप्रमाणे नुसतीच डोळे फाडून जोग्याकडे बघत राहिली. हातात भिक्षा भरून आणलेले ताट कधी गळून खाली पडले याचेही तिला भान नव्हते. तिची भयाने दिगमूढ झालेली अवस्था पाहून नाथ म्हणाले, “ए माई! अशी भुतासारखी टकामका काय पाहतेस? उशीर लावू नकोस! बाळ कुठे आहे ते दाखाव?

मच्छिंद्रनाथांनी जरबेची भाषा ऐकून ती विचार करू लागली की आता सत्य सांगितले पाहिजे. खरे बोलण्यामुळे, चूक झाली असली, तरी माफी मिळायची शक्यता असते. सत्यनिती आचरण्याचा भगवंत पाठीराखा असतो, आता सत्य कथन केलेच पाहिजे प्राण राहो अथवा जावो. अशा निर्धाराने तिने नाथांच्या चरणावर मस्तक ठेवले आणि हात जोडून सरस्वती म्हणाली, “महराज! माझ्या हातून घोर अपराध घडला आहे. मला क्षमा करा, तुम्ही दिलेले भस्म न खाता शेजारणीच्या चुकीच्या सल्ल्याने मी ते उकिरड्यांत फेकले. शेजारणी म्हणाली भस्माने मुले होतात का? सुंदर स्त्रियांना मोहित करण्यासाठी अशी नाटके केली जातात. त्यांच्या बोलण्यामुळे माझी बुद्धी भ्रष्ट झाली आणि आपल्या विषयी मनात संशय निर्माण झाला. भीतीमुळे ते भस्म मी टाकून दिले पण आजपर्यंत मी ही गोष्ट कुणालाही सांगितली नाही.”

मानवजन्मी परोपकार करावा, न जमले तर कुणाचे अहित तरी करू नये, धर्माचरण करण्यास जमले नाही तरी कोणाला अधर्मास लावू नये, स्वतःला तीर्थाटन जमले नाही तरी दुसरा जात असेल तर मोडता घालू नये, आपली बुद्धी खर्च करून कुणाचे विवाह कार्य मोडू नये. गोमाता कुणाचा चारा खात असेल तर बोभाटा करू नये. अधिकारी अपराध्यांना शासन करीत असतील तर त्यांच्या कामात व्यत्यय आणू नये. कुणा गरिबावर अन्याय होत असेल तर गप्प राहून पाहू नये. मुलांसमोर पित्याच्या अवगुण वर्णन करू नयेत, तसेच सुने समोर सासूला वाईट म्हणू नये. कुणी विहीर खणून बागाईत करीत असेल तर त्याला आडवू नये. कुणी कीर्तनाला जात असेल तर त्याला रोखू नये. आपल्या वाचाळपणामुळे दुसऱ्याचे नुकसान होणार असेल तर मौन राहणे सर्वोत्तम! अशा प्रकारच्या नितीवचनांचे स्मरण करून सरस्वती बोलली, “महाराज! त्याक्षणी मनात विश्वास नसल्यामुळे मी चूक केली. मी करंट्या कपाळाची, फुटक्या नशिबाची, दैवहीन आहे. मला क्षमा करा. उपाय अपाय झाला. रस्त्यात धनाचे गाठोडे पडलेले असते पण फुटक्या नशिबाचा मनुष्य नेमक्या त्याचवेळी डोळेबंद करून चालता येईल की नाही हे पाहण्यासाठी तो आंधळयाचे सोंग घेऊन चालत चालत दूर जातो. कल्पवृक्षाच्याखाली बसले असता मनातील कल्पना प्रत्येक्षात साकार होतात, परंतु दैवहीन मनुष्याच्या मनात पिशाच्च कल्पना याव्यात तसे माझे झाले. योगीराज! माझ्यावर कृपा करा, क्षमा करा, मला शिक्षा करू नका.”

विप्रपत्नी सरस्वतीची कहाणी ऐकून मच्छिंद्रनाथ हताश झाले, निराश मनस्थितीत विचार करू लागले. स्त्री जातच पापी असून विश्वास ठेवण्यालायक नाही. हित अहीताची पारख न करता भलतेच करणार आणि स्वतःबरोबर दुसऱ्यालाही

बुडविणार. बेचाळीस पिढ्या नरकात घालणार. स्त्रियांच्या संगतीचा लाभ किंचित पण हानी फार! दिवसभर भाड्याच्या बैलासारखे लाभले तरी त्याचे उपकार मानणार नाहीत. स्त्री पासून विषय सुख मिळते असे म्हणतात पण ते खरे नाही कारण त्या भोगात पुरुषांची वीर्यशक्ती नष्ट होऊन बलहिनता येते. अशा प्रकारे जीव नरकात ढकलला जातो. शिष्याने केलेले पाप गुरूला फेडावे लागते. तद्वत स्त्रीने केलेले पाप तिच्या पतीला फेडावे लागते. खरं तर स्त्री म्हणजे अनर्थाचे मूळ. स्त्रीच्या नादी लागून तिच्या बुद्धीने जो चालतो तो महामुर्ख, दुष्कार्माचा धनी होतो. त्याच न्यायाने मी या स्त्रीच्या नादी लागून मुर्ख झालो. हया स्त्रीच्या बोलांना भुलून संजीवनीचे सूर्यवीर्ययुक्त भस्म दिले आणि तिने ते फेकून दिले. असो! संजीवनी मंत्र अमर आहे. मी दिलेल्या दिव्य भास्मांत ते कुठेही पडले असले तरी देहधारणा झालीच असेल. आता ती जागा कोणती आहे ते तरी तिला विचारावे म्हणून नाथ म्हणाले,

“अहो माई! उठ आता दैवयोगे जे झाले ते झाले. तुला शिक्षा करून किंवा तुला रागावून माझ्या पदरी काही पडणार नाही आता कृपा करून जेथे कुठे ते भस्म टाकले आहेस ती जागा मला दाखव.” नाथांची ही समंजसपणाची भूमिका जाणवल्यावर सरस्वती सावरली, भस्म फेकलेले ठिकाण दाखवण्यासाठी त्या जागी जाऊ लागली आणि नाथ तिच्या मागे जाऊ लागले. फार मोठ्या शेणाच्या गोवऱ्यांचा ढीग साठलेल्या उकिरड्याची जागा तिने दाखविली. तो भला मोठा ढिगारा पाहून नाथ कळवळले. त्यांनी ममतेने साद घातली. “हरी नारायणा, मित्रवर्या, सूर्यसूता, प्रतापवंता जर तू या गोवऱ्यांचा ढिगात असशील तर सत्वर बाहेर यावे. या गोवऱ्यांचा राशीत तुझा जन्म झाला म्हणून ‘गोरक्ष’ असे तुझे नाव ठेवतो. बारा वर्षे गोवर रक्षणार्थ आंत राहिलास म्हणून गोवर रक्षक नावाने, गोरक्ष उपाधीने तुला संबोधतो. आता विलंब करू नकोस. हे गोरक्षनाथ! लवकर बाहेर ये.”

नाथांचे बोलणे पूर्ण होताच त्या ढिगाऱ्यामधून देव्हाऱ्यातील घंटी किणकिणावी तसे नादमधुर स्पष्ट आवाजात उत्तर मिळाले, “गुरुमहाराज! मी गोरक्ष आत आहे. गोवाऱ्यांच्या ढिगाऱ्याखाली अडकलो आहे. शरीर दडपले गेले आहे. डोईवर अवजड वजन असल्याने मला हालचाल करता येत नाही. गुरुदेव! गोवाऱ्यांचा ढीग बाजूला काढून मला बाहेर काढा” हे ऐकताच मच्छिंद्रनाथांनी तत्काळ फावडे घेऊन गोवाऱ्यांचा ढीग हटवून सुकुमार बालक बाहेर काढला. बारा वर्षांचा तेजस्वी मुद्रेचा जणू उगवता सूर्य, जणू काही पौर्णिमेचा शोभिवंत चंद्र, जसा मदनाचा पुतळा! साक्षात विष्णूरूप! कुंकूमाकारी पदपंकज लांबसडक बोटांवरील चंद्राकार नखं, घोटीव गोऱ्यापान पोटऱ्या, कर्दळस्तंभासारख्या नितळ मांड्या, खांद्यापासून गुढघ्यापर्यंत लांब असणारे अजानबाहू, चवळीच्या शेंगेसारखी हातांची लांबसडक बोटे. रुंद खांदे, देखणा चेहरा, सरळ धारदार नाक, काळेभोर टपोरे डोळे, गौरवर्णीय भव्य कपाळ, लाल चुटूक ओठ, मुख म्हणजे वेदरुपी धनाचे निवास्थान, मस्तकावर कुरळ्या केसांचा जटाभार. रेखीव शिल्पासारखे ते सुंदर बालक पाहून विप्रपत्नी सरस्वतीने आपल्या कपाळावर हात मारून घेतला आणि आपल्या प्रारब्धाला दोष देत रुदन करीत, मनात म्हणाली, “असा बाळ माझ्या उदरी जन्माला आला असता तर मी किती भाग्यवान ठरली असते? दुसऱ्याचे ऐकून मी माझे नुकसान केले आहे. मी फारच अभागी आहे.” तिच्या दुःखाला सीमा राहिली नाही. बाळ! बाळ!! असं आर्त स्वरात ती हुंदके देत होती. तिच्या हृदयाची तगमग शांत होत नव्हती. ते पाहुन मच्छिंद्रनाथ म्हणाले,

“माई! आता रडून कोणासाठी शोक करतेस? बारा वर्षापूर्वी भस्म देतांना मी तुला स्पष्ट सांगीतले होते, की या भस्माचे भक्षण केल्यास तू तेजाची माता होशील. तू त्यावर विश्वास ठेवला नाहीस. खरं तर हा बाळ तुझ्या नशिबात नव्हता, हे म्हणण्या ऐवजी या बाळाची माता होण्याचे तुझे भाग्य नव्हते हेच खरे. आता उगीच शोक करून माझ्यात अडथला

आणशील तर माझ्या शापाला बळी पडशील आणि त्या शापातून ब्रह्मदेवसुद्धा तुझी सुटका करणार नाही. माझ्यासमोर थांबूही नकोस चल दूर हो!" नाथांचा क्षोभ आणि तिच्या कृत्यविषयीची निर्भत्सना ऐकून ती घाबरून घरात पाळली. जमलेले शेजारी पाजारी हळहळत होते आणि या चमत्काराबद्दल आश्चर्य व्यक्त करीत होते.

त्यानंतर गोरक्षाने गुरुचरणांवर मस्तक टेकवून नमस्कार केला. मच्छिंद्रनाथांनी ममतेने त्याला स्वतः जवळ बसवून अनुग्रह दिला. 'ॐ' हा एकाक्षरी मंत्र जपण्यासाठी दिला. प्रणवाची योगदीक्षा दिली. त्याच्या माथ्यावर वरदहस्त ठेऊन सज्ञान केले. मायेने, वात्सल्याने गोरक्षाचे मुख कुरवाळले मग त्याच्या हाताला धरून म्हणाले, "तान्हुल्या! उठ आता. चला!! भूलोकातील तीर्थस्थाने पाहूया."

"अवश्य गुरुदेव!!" असे म्हणून बाळ गोरक्ष गुरुचे बोट धरून निघाला.

बंगाल देशातील चंद्रगिरी नगर सोडून दोघेही गुरुशिष्य जगन्नाथाच्या दर्शनासाठी जात असताना कनकगिरी गावात ते अंमळ विश्रांतीसाठी थांबले असतांना मच्छिंद्रनाथ म्हणाले, "गोरक्षा! अतिशय भुकेने प्राण कंठाशी आले आहेत. झोळी घेऊन गावात जा आणि भिक्षा घेऊन ये" गुरुआज्ञा प्रमाण मानून गोरक्ष निघाला. एका ब्राह्मणाच्या घरी पितृश्राद्ध असल्याने ब्राह्मणवृद्धांचे भोजन तसेच भिक्षुकांना अन्नवाटप करण्यात येत होते. त्याठिकाणी जाऊन लहाग्या गोरक्षाने, "अल्लख निरंजन! भिक्षा वाढा माई!!" असा पुकारा केला. त्या घरातल्या याजमानीने हा गोजिरवाणा बटू संन्याशी पाहताच हा तर सूर्यसारखा तेजस्वी, दिव्यदेहधारी सुंदर बालक दिसतो आहे, हा विचार केला आणि लगबगीने तिने अन्नपदार्थ वाढलेली पत्रावळ आणली, पोळीभात, पुऱ्या, खाज्या, करंज्या, शिरा, कचोरी, मालपुवा, लाडू, बुंदी, घाऱ्या, वाड्या, पातवड्या, सौम्य मठ्ठा भरलेला द्रोण, चटण्या कढी, रायते, सांबर, वडे, दहीवडे, सार, आमटी, मेतकुट, वरण, अशी विविध प्रकारची, स्वादांची, षड्रसपरिपूर्ण पंचपक्वान्ने वाढलेले ते पान गोरक्षाच्या स्वाधीन करून तिने नमस्कार केला. अन्नदात्या स्त्रीवर प्रसन्न होऊन गोरक्षाने आशीर्वाद दिला, "माउली! तू धन्य आहेस भुकेल्याची भूक जाणलीस. तुझे कल्याण होईल!!" गोरक्षाने मनात विचार केला की पोटापुरते अन्न निश्चितच मिळाले आहे, आता नाहक भटकंती कशासाठी करावी? या उद्धेशाने पत्रावळ झोळीत ठेवली. गुरु जवळ जाऊन त्यांच्या पुढ्यात ते अन्न ठेवले. दोघेही प्रसन्न मनाने त्या स्वधिष्ट अन्नाचा आस्वाद घेत भोजन करू लागले. त्या सर्व रुचकर पदार्थातील वडा नाथांना खूपच आवडला. आणखी वडे मिळाले तर बरे होईल अशा विचाराने त्यांनी गोराक्षाकडे पहिले. गुरुजींना काहीतरी हवे आहे हे त्याने ओळखले आणि विचारले, "गुरुमहाराज! आणखी कांही खाण्याचे पदार्थ हवे असल्यास आज्ञा करावी." मच्छिंद्रनाथ संकोचाने म्हणाले, "काही नाही रे बाळा! वडे फार चवदार वाटले, आणखी असते तर बरे झाले असते, पोट भरून मन तृप्त झाले असते."

गोरक्ष उत्तरला, "एवढेच ना? मी आता जाऊन वडे मागून आणतो." पुनश्च त्या ब्राह्मणाच्या घरी गोरक्ष पोहोचला आणि त्या स्त्रीस हाक मारली. "माई! पुन्हा भिक्षा द्या. माझ्या गुरूंना वडे फारच आवडले आहेत. त्यांना खाण्यासाठी आणखी थोडे वडे द्यावेत."

गोरक्षाच्या या मागणीने त्या विप्र स्त्रीच्या मनात संदेह उत्पन्न झाला. ती म्हणाली, "वारे व्वा छोटे महाराज! फारच हुशार आहात की. गुरूंच्या नावाखाली स्वतःच्या जिभेचे लाड चालवले आहेत की काय? तुमच्या मनातला लोभ मला समजलाय पण तुम्ही आव मात्र गुरुभक्तीचा आणला आहे. गोरक्ष म्हणाला, "नाही माते! गुरुजींच्या नावाने कधी ही

लबाडी करणार नाही, खरोखरच गुरुजींनाच वडे पाहिजेत. त्यांची इच्छा पूर्ण करण्यासाठीच पुन्हा भिक्षेसाठी आलो आहे." त्यावर ती म्हणाली, "एकदा भक्ती भावाने दिले आहेत आता पुन्हा हवे असतील तर गुरुभक्ता फुकट काही मिळणार नाही."

त्यावर गोरक्ष म्हणाला, "माई काय पाहिजे ते माग! पण वडे दे." ती म्हणाली, "परम गुरुभक्त दिसतो आहेस, तुझा एक डोळा काढून देतोस का?" गोरक्ष आत्मविश्वासाने म्हणाला, "माई! त्यात काय विशेष आहे? गुरुसाठी प्राणार्पण करण्याची तयारी आहे माझी तेथे डोळयाची काय कथा?" असे म्हणून कराची अनामिका डोळयांत खुपसून तो म्हणाला, "हा घे माझा डोळा आणि आता तरी वडे दे!" डोळयाच्या खाचेतून रक्ताची धर वाहू लागली अंगावरील कफनी रक्ताने भिजली. जमिनीवर रक्त ओघळले त्या लाल भडक रक्ताने धरणीला कुंकूम मळवट भरला. सहज चेष्टा मस्करी म्हणता म्हणता असे झाल्याचे पाहून ती विप्र स्त्री फारच घाबरली, मनात म्हणाली मी विनाकारण त्याला गुरुभक्तीवरून डिवचले. हा तर सच्चा गुरुभक्त आहे. गुरुसाठी स्वतःचा डोळा बाहेर काढला. ती पळत स्वयंपाकघरात गेली आणि पाच सात वडे घेऊन आली. वडे देतांना म्हणली, "मी सहज बोलले होते, आपण ते इतक्या गंभीर पणे घ्याल असे वाटले नव्हते, माझी चूक झाली. मला क्षमा करावी. स्वतः दुःख सोसून, इतरांना सुख देणारे आपण परमदयाळू संत महात्मे आहात!!" अशा प्रकारचा पश्चाताप करीत ती स्त्री मटकन खाली बसली.

गोरक्ष त्या स्त्रीला धीर देत बोलला, "तू का घाबरतेस? वड्याच्या बदल्यात डोळा हा साधा व्यवहार आहे." तर ती म्हणाली, "हे तपस्व्या! माझ्यावर कुर्पा कर, तु तुझा हा डोळा आणि सर्व वडे घेऊन जा. मला तो रक्तस्त्राव आणि दुःख पाहवत नाही, माझ्यावर राग धरू नकोस! द्या कर."

गोरक्षाने डोळयाच्या खोबणीवर कपडा बांधला. वडे नेऊन गुरुजीपुढे ठेवले आणि हात जोडून म्हणाला, "गुरु महाराज!! वडे खावेत!" मच्छिंद्रनाथ त्याचाकडे पाहून म्हणाले, "वत्सा डोळयावर कापड का बांधले आहेस?"

"काही नाही! उगीचच डोळा झाकला आहे." गोरक्ष खरं सांगण्याचे टाळत होता. सत्य घटना कळल्यानंतर गुरु महाराजांना दुःख होईल आणि ते वडे खाणार नाहीत, असे गोरक्षाला वाटत होते.

मच्छिंद्रनाथ म्हणाले, "सोड ते कापड आणि काय झाले ते मला दाखव!"

"महाराज! आधी वडे खावेत, नंतर दाखवेन. जरासा डोळा सुजला आहे. ठणकापण जाणवतोय. आताच डोळा पाहाल तर आपल्याला भोजन सुचणार नाही, म्हणून म्हणतो भोजनानंतर पहावे."

"गोरक्षा! ते होणार नाही. आधी डोळा दाखव; मगच भोजन करीन नाही तर ह्या अन्नास गोमांस समजेन." श्रीगुरुंचे हे निर्वाणीचे बोलणे ऐकल्यावर गोरक्षाने घडलेली घटना सांगितली आणि डोळयावरील कापडी पट्टी दूर केली. हात जोडत माफी मागू लागला.

"गुरुदेव! माझ्यावर रागवू नका, मी चुकलो. तूम्हाला क्लेश दिले. मला क्षमा करा." डोळयाची जखम पाहून मच्छिंद्रनाथ थक्क झाले. त्या कोवळया बालकाचा निरागसपणा आणि गुरुवरील श्रद्धा पाहून ते भारावले. प्रसन्न होऊन म्हणले, "ते बुब्बुळ कुठे आहे? दे इकडे" असे म्हणून त्यावर संजीवनी मंत्रप्रयोग करून ते डोळयाच्या खोबणीत बसवले. डोळा पुन्हा पहिल्यासारखा सचेतन झाला. जखम आणि वेदना नाहीशा झाल्या. डोळेतर पहिल्यापेक्षा तेजस्वी दिसू लागले. गोरक्षाला

मांडीवर बसवून भोजन भरवित नाथ म्हणाले, “धन्य धन्य गोरक्षा! तुझी गुरुभक्ती आणि निष्ठा पाहून मी प्रसन्न झालो आहे. तुला सर्व विद्यांनी पारंगत करण्याचे मी ठरविले आहे.” त्यानंतर महिनाभर ते तिथेच राहिले. नाथांनी त्याला सर्व विद्या शिकवून पारंगत केले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांचे शिक्षण प्राप्त होईल.